महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांना लागू असलेल्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत संबंधित कर्मचा-यांच्या अंशदानात वाढ करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१६/प्र.क्र.५०/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केटजवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०००01
तारीख: ८ ऑक्टोबर, २०२१

**वाचा -**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अंनियो-२०५/प्र.क्र.१२६/सेवा-४, दि. ३१.१०.२००५
२) परिपत्रक,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, क्रमांकः मजीप्रा/वित्त-२/पअंनिवेयो/५३०, दि.१४.५.२०१०
३) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दि.२३.०३.२०१७.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अंनियो-२०१९/प्र.क्र.२६६/सेवा-४, दि. १९.८.२०१९
५) शासन पत्र, क्रमांकः मजीप्रा-२०१६/प्र.क्र.५०/पापु-२३, दि. २६.७.२०२१

**प्रस्तावना -**

दिनांक १.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त होणा-या राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी संदर्भाधिन दिनांक ३१.१०.२००५ च्या शासन निर्णयान्वये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आली असून सध्या या कर्मचा-यांना राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS) लागू आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये देखील दिनांक १.११.२००५ किंवा त्यानंतर नियुक्त होणा-या प्राधिकरणाच्या कर्मचा-यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS) प्राधिकरणाने संदर्भाधिन (२) च्या परिपत्रकान्वये लागू केली आहे. सदर योजनेमध्ये कर्मचा-यांच्या वेतनातून संबंधित कर्मचा-यांचे १०% अंशदान व प्राधिकरणाकडील सममूल्य १०% अंशदानाची रक्कम प्राधिकरणामार्फत संबंधित कर्मचा-यांच्या DCPS खात्यामध्ये जमा केली जाते.

२. संदर्भाधिन (३) येथील शासन निर्णयान्वये दिनांक २३ मार्च, २०१७ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी / कर्मचारी यांचे वेतन भत्ते व निवृत्तीवेतनाचे दायित्व राज्य शासनाने स्विकारले आहे. राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शासकीय कर्मचा-यांना देण्यात येणारा नियोक्त्याचा (राज्य शासनाचा) हिस्सा दिनांक १९.८.२०१९ च्या शासन निणयान्वये १० % ऐवजी १४ % इतका करण्यात आला आहे. त्याच धर्तीवर महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत देण्यात येणारा नियोक्त्याचा हिस्सा १०% ऐवजी १४% करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

दिनांक १.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये नियुक्त झालेल्या व परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना (DCPS) लागू असलेल्या कर्मचा-यांना देण्यात येणारा नियोक्त्याचा (प्राधिकरणाचा) हिस्सा “नियोक्त्याचे अंशदान” म्हणून “वर्गणीदाराचे मूळ वेतन अधिक महागाई भत्ता” या रक्कमेच्या १४ % इतका पुढील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**(i) संदर्भाधीन दिनांक २६.७.२०२१ च्या पत्रान्वये सूचित केल्यानुसार प्राधिकरणाने राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना ट्रस्टसोबत स्वतंत्र करार करुन निवृत्तीवेतन निधी नियामक व विकास प्राधिकरणाच्या नियमानुसार प्रथम कार्यवाही करावी.**

२. नियोक्त्याच्या अंशदानामध्ये करण्यात आलेली उपरोक्त वाढ दिनांक १ एप्रिल, २०१९ पासून देय राहील.

३. “कर्मचा-यांचे अंशदान” म्हणून कर्मचा-यांचे “मूळ वेतन अधिक महागाई भत्ता” या रक्कमेच्या १०% इतके मासिक अंशदानाची रक्कम संबंधित कर्मचा-याच्या वेतनातून पूर्वीप्रमाणेच कपात केली जाईल.

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च “मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८७/व्यय-३, दिनांक १७.८.२०२१ तसेच अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०५/२१/सेवा-४, दिनांक ७.९.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००८१३२३३९२०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB
BABASAHEB
HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2021.10.08 14:43:43 +05'30'

( बाळासाहेब बा. हजारे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
८. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
९. मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
१०. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
११. अधिक्षक अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१२. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१३. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व

प्रत:

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय, मुंबई
४. वित्त विभाग, व्यय-३ / सेवा-४ कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
५. पापु-४ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई १
६. निवडनस्ती, पापु-२३